राज्यातील कार्यान्वित शासकीय उपसा सिंचन योजनांच्या विद्युत देयकांबाबत शाश्वत स्वरूपातील उपाय योजना सुचविण्यासाठी समिती गठित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. समिती -०९१८/प्र.क्र. ५७८/१८/मो.प्र.१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०३ नोव्हेंबर, २०१८.

**प्रस्तावना:**

राज्यातील विविध नदी खोऱ्यांमधील उपलब्ध असलेल्या पाण्याच्या पूर्णत: वापर होण्याच्या दृष्टीने जेथे प्रवाही पध्दतीने सिंचन सुविधा देणे वैशिष्ट्येपूर्ण भुरचनेनुसार शक्य नाही अशा ठिकाणी उपसा सिंचनाद्वारे सिंचन सुविधा उपलब्ध करुन शेतकऱ्यांना आर्थिकदृष्ट्या सक्षम करण्याच्या दृष्टीने २००० हे. पेक्षा अधिक सिंचन क्षेत्र असलेल्या अनेक उपसा सिंचन योजनांची कामे शासनाने हाती घेतली आहेत. यातील अनेक योजना अंशत: / पूर्णत: कार्यान्वीत झाल्या असून परिचालन विषयक अडचणींमधून तात्पूरत्या उपाययोजनांद्वारे योजना बऱ्याच प्रमाणात कार्यरत आहेत. परिचालन विषयक अडचणींमध्ये प्रमुख अडचण वेळच्या वेळी विज देयक भरणे शक्य न झाल्याने विद्युत पुरवठा खंडित होणे ही आहे. त्यामुळे पाणी उपलब्ध असूनही विद्युत पुरवठया अभावी योजना बंद राहतात व अंतिमत: कृषी उत्पादन व उत्पन्नावर विपरित परिणाम होतो. या समस्येवर शाश्वत स्वरुपात उपाययोजना सुचविण्यासाठी एक समिती नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

जलसंपदा विभागांतर्गत कार्यान्वित झालेल्या राज्यातील सर्व शासकीय उपसा सिंचन योजनांच्या विद्युत देयकांबाबत शाश्वत स्वरुपातील उपाय योजना सुचविणे,उपसा सिंचन योजनांचा विज खर्च, शीर्ष कामाच्या देखभाल दुरुस्ती व परिचलनाबाबतचा खर्च कमी करण्यासाठी उपाययोजना सुचविणे,उपसा सिंचन योजनेची देखभाल व त्याअंतर्गत स्थापत्य / यांत्रिकी /विद्युत घटकांवरिल खर्च कमी करणे, उपसा सिंचन योजनांची विद्युत देयके नियमितपणे अदा करणे इ.बाबत उपाय योजना सुचविणे,विद्युत देयकांची समस्या शेतक-यांकडून वीजदेयक व पाणीपट्टी जमा करण्यात येणा-या क्षेत्रीय अडचणी व त्यावर उपाययोजना, राज्यातील सर्व महामंडळांतर्गत कार्यान्वित उपसा सिंचन योजना सक्षमपणे चालवून निर्मित सिंचन क्षेत्र वाढविणेबाबत करावयाच्या उपाययोजना इ. संदर्भात सर्वंकष आढावा घेऊन शासनास या संदर्भातील प्रचलित धोरणास अनुसरुन काही ठोस शिफारशी करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | कार्यालयाचे नांव | पद |
|---|---|---|---|
| १ | श्री. आर. बी. घोटे | कार्यकारी संचालक ( सेवा निवृत्त ), महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे | अध्यक्ष |
| २ | श्री. एस.डी. कुलकर्णी | मुख्य अभियंता ,तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव | सदस्य |
| ३ | श्री. ए.आर. कांबळे | मुख्य अभियंता , गोसीखुर्द प्रकल्प, नागपूर | सदस्य |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | श्रीमती. वा. अ. अंकुश | मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई | सदस्य |
| ५ | श्री. अ. सं. बोडके | मुख्य अभियंता (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक. | सदस्य |
| ६ | श्री. एच.व्ही. गुणाले | अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली | सदस्य सचिव |

समितीची कार्यकक्षा अध्यक्ष व सर्व संबंधित सदस्यांशी चर्चा करुन निश्चित करावी तसेच समितीमधील राज्य शासनाच्या सेवेत कार्यरत नसलेल्या सदस्यांना बैठकीच्या कामकाजाच्या प्रत्येक दिवसाकरिता मानधन वित्त विभागाच्या मान्यतेने प्रचलित नियमानुसार देण्यात येईल. यात प्रत्यक्ष प्रवासाकरिता लागलेल्या दिवसांचाही समावेश करण्यात येईल. प्रत्येक सदस्यांचे निवासस्थान हे त्यांचे मुख्यालय म्हणून गृहित धरण्यात येईल. प्रत्येक सभासद स्वत: प्रमाणित केलेली कामकाजाची दैनंदिनी (डायरी) ठेवतील व त्याआधारे मानधनाची रक्कम निश्चित करून प्रदान करण्यात येईल.

उपरोक्त समितीने प्रस्तावनेत नमूद केलेल्या मुद्यांचा सर्वंकष आढावा घेऊन मा.मंत्री (जलसंपदा) यांना सादर करण्याकरीता आपला अहवाल शासनास दि.३१/१२/२०१८ पूर्वी सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१८११०३१७५३१२२३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Vijendra Prabhakar Palwankar

Digitally signed by Vijendra Prabhakar Palwankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7cb5ce90d018bdc109ad48f37ca4a3b06b0347375607bff9b7cc525c4c213e75, serialNumber=1525bd95a04e2d242eaa74f8dbc215ca88aa7bfb907686a9a62b37f3a74e5eba, cn=Vijendra Prabhakar Palwankar
Date: 2018.11.03 17:56:55 +05'30'

**( वि. प्र. पालवणकर )**
**शासनाचे कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
३. स्विय सहायक, अ.मु.स. (वित्त) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई.
४. स्विय सहायक, अ.मु.स. (नियोजन) नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई.
५. स्विय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा) जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
६. स्विय सहायक, प्रधान सचिव (उर्जा) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई.
७. स्विय सहायक, सचिव (प्रकल्प समन्वय) जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
८. स्विय सहायक, सचिव (लाक्षेवि) जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
९. स्विय सहायक, मु.अ. (द. व प्र.) व स.स. , जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
१०. कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
११. कार्यकारी संचालक, गोदावरी व मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.

१२.कार्यकारी संचालक, कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे.
१३.कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
१४.कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१५.श्री. आर. बी. घोटे, कार्यकारी संचालक(से. नि.),महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
१६.श्री. एस.डी कुलकर्णी, मुख्य अभियंता ,तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१७.श्री. ए.आर. कांबळे, मुख्य अभियंता , गोसीखुर्द प्रकल्प, नागपूर.
१८. श्रीमती. वा. अ. अंकुश, मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई.
१९. श्री. अ. सं. बोडके, मुख्य अभियंता (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक.
२०. श्री. एच.व्ही. गुणाले, अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली.
२१. सर्व सह सचिव /उप सचिव जलसंपदा विभाग मंत्रालय मुंबई.
२२. सर्व कार्यासन अधिकारी, जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई.
२३. मोप्र-१ कार्यासन संग्रहार्थ.